**खेकडा संवर्धन प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**
**सन २०१७-१८ साठी राष्ट्रीय कृषी विकास योजना (RKVY) अंतर्गत अर्थसहाय्य**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-२०१७/प्र.क्र. १३८/पदुम-१४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २१ जून, २०१७

वाचा

१) **आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. मत्स्य/ भू/०२०९०१/ ०८/२०१७ ,दि२०.०१.२०१७ .**
२) कृषि व पदुम विभाग पत्र क्रमांक RKVY-१२१६/C.R.१४६/RKVYCELL, दि.०८.०५.२०१७
३) कृषि व पदुम विभाग पत्र क्रमांक आरकेव्ही ०३१७/सीआर -१४, दि.९.६.२०१७

**प्रस्तावना**

राज्याला ७२० कि.मी.चा सागरी किनारा लाभलेला असून सदर सदर सागरी किनाऱ्यावर ७० खाडया आहेत. राज्याचे सध्या सागरी मत्स्योत्पादन सुमारे ४.५ लक्ष मेट्रीक टन इतके असून त्यामध्ये खेकडयाचे उत्पादन अल्प प्रमाणात आहे. तसेच, खेकडयासाठी सुव्यवस्थापित मत्स्यव्यवसाय उद्योग अद्याप व्यवसायिकदृष्टया विकसीत नाही. त्यामुळे खेकडा संवर्धनाची आवश्यकता लक्षात घेता राज्यातील मत्स्यसंवर्धकांना खेकडा पालनासाठी प्रोत्साहित करण्यासाठी संदर्भाधीन क्र.१ येथील पत्रान्वये आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी राज्यातील ७ सागरी जिल्हयातील (पालघर, ठाणे, मुंबई उपनगर, मुंबई शहर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग) खेकडा संवर्धनाकरिता रु.१.९९ कोटी इतक्या अर्थसहाय्याचा सविस्तर प्रकल्प अहवाल राकृवियो अंतर्गत शासनास सादर केला होता. सदर प्रकल्प अहवाल दि.१३.०१.२०१७, दि.०४.०२.२०१७ व दि.०३.०३.२०१७ रोजीच्या राज्यस्तरीय प्रकल्प छाननी समितीसमोर सादर करण्यात आल असता संदर्भाधीन क्र.२ येथील पत्रान्वये निर्गमीत करण्यात आलेल्या इतिवृत्तांन्वये त्यास मान्यता देण्यात आलेली आहे. तद्नंतर सदर प्रस्ताव दि.२५.५.२०१७ रोजीच्या राज्य प्रकल्प मंजुरी समितीसमोर ठेवण्यात आला असता त्यास संदर्भाधीन क्र.३ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी सादर केलेला प्रस्ताव व राज्य प्रकल्प मंजुरी समितीने दिलेली मान्यता लक्षात घेता राज्यात खेकडा संवर्धनासाठी मत्स्यसंवर्धकांना अर्थसहाय्य देण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

शासन या निर्णयान्वये राज्यातील ७ जिल्हयातील (पालघर, ठाणे, मुंबई उपनगर, मुंबई शहर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग) केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषी विकास योजना (RKVY) अंतर्गत प्राप्त होणाऱ्या अर्थसहाय्यातून मत्स्यसंवर्धकांना खेकडा पालन करण्यासाठी राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत रु.१.९९ कोटी रकमेच्या प्रकल्प प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देत असुन त्यामध्ये राकृवियो हिस्सा व लाभार्थी हिस्सा ५०:५० प्रमाणात राहील. सदर प्रकल्पावरील बाबनिहाय खर्च खालीलप्रमाणे राहील.

| अ. क्र. | बाब | राकृवियो हिस्सा (रु. कोटी)५० टक्के हिस्सा | लाभार्थी हिस्सा (रु. कोटी)५० टक्के हिस्सा |
|---|---|---|---|
| १ | पेन कल्चर | ०.६९ | ०.६९ |
| २ | खाद्य, खेकडा बीज व किरकोळ दुरुस्ती | ०.३० | ०.३० |
| | एकूण | ०.९९ | ०.९९ |

सदर प्रकल्पाच्या लाभार्थी व प्रकल्प जागेच्या निवडीकरिता खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय समती गठित करण्यात येत असून प्रकल्पाची योग्यरित्या अंमलबजावणी करण्याची जबाबदारी समितीची असेल.

१) सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय - अध्यक्ष
२) संबंधित जिल्हाधिकारी यांचे प्रतिनिधी - सदस्य
३) मुख्य वन संरक्षक, कांदळवने यांचा प्रतिनिधी - सदस्य
४) मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी - सदस्य सचिव

आयुक्त मत्स्यव्यवसाय,महाराष्ट्र राज्य, मुंबई हे उपरोक्त प्रकल्पाचे संनियंत्रण अधिकारी राहतील. प्रकल्प विहित कालावधीत पूर्ण करण्याची व उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याची जबाबदारी ही आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६२११७४२१२०००१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shri Ravindra Gurav

Digitally signed by Shri Ravindra Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, cn=Shri Ravindra Gurav
Date: 2017.06.21 17:39:42 +05'30'

**(रविंद्र गुरव)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
३) मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४) मा. राज्यमंत्री(पदुम) यांचे खाजगी सचिव
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद.
६) सचिव, भारत सरकार, कृषि मंत्रालय, (पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग)
७) कृषि भवन, नवी दिल्ली
८) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९) अपर मुख्य सचिव (नियोजन ), मंत्रालय, मुंबई
१०)अपर मुख्य सचिव (वित्त ), मंत्रालय, मुंबई
११)आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१२) प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, कोकण विभाग.

१३) सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग

१४) प्रधान महालेखापाल १, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई

१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१६) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई

१७) जिल्हा कोषागार अधिकारी ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग

१८) सहसंचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई

१९) कक्ष अधिकारी (पदुम १२, पदुम १३, पदुम १४, पदुम १६)

२०) निवडनस्ती